**जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, खेड-राजगुरुनगर, जिल्हा पुणे यांचे नांवे स्वीय प्रपंजी लेखा खाते सुरु करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीटी-२०१५/प्र.क्र.१३१/परिवहन-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०९ फेब्रुवारी, २०१७.

**संदर्भ:-** १) गृह विभाग, शासन अधिसूचना क्र. एमसीटी-०८०५/१०६३/१३६/परि-५, दि.२५.७.२००६.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमसीटी-२०१५/प्र. क्र. १३१/परि-५, दि.१८.२.२०१६.

**प्रस्तावना:-**

विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ वरील दि.२५.७.२००६ रोजीच्या शासन अधिसूचनेनुसार, मोटार अपघातातील नुकसान भरपाईसाठी राज्यातील सर्व जिल्हा व तालुक्याच्या ठिकाणी त्या त्या महसुल परीक्षेत्रासाठी दर्शविण्यात आलेल्या क्षेत्रासाठी मोटार अपघात दावा न्यायाधिकरणांची स्थापना करण्यात आली आहे. विभागाच्या समक्रमांकाच्या संदर्भाधीन क्र. २ वरील दि.१८.२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार, जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त सत्र न्यायाधीश तथा पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, खेड-राजगुरुनगर, जि. पुणे यांना “कार्यालयप्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात आले आहे. मोटार अपघात प्रकरणांमध्ये जमा होणाऱ्या रक्कमा स्वीय प्रपंजी खात्यामध्ये जमा करणे आवश्यक असल्याने, नवीन स्वीय प्रपंजी खाते सुरु करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम ४९४ व ४९५ अन्वये मोटार अपघात प्रकरणांमध्ये जमा होणाऱ्या रक्कमांसाठी जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, खेड-राजगुरुनगर, जिल्हा पुणे या न्यायालयासाठी स्वतंत्र स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ठेवींच्या रकमा कोषागारात भरताना प्रत्येक चलनामध्ये खालीलप्रमाणे वर्गीकरण दर्शविण्यात यावे.

| | | |
|---|---|---|
| ८४४३ | - | दिवाणी ठेवी |
| ०० | - | |
| १०६ | - | पीडी/पीएलए |
| ०० | - | गृह विभाग |
| ०० | - | मोटार अपघात दावा न्यायाधिकरण |
| ०१ | - | ८४४३५०९३ |

३. सदर लेखा उघडल्यावर पुढील गोष्टींची पूर्तता करणे आवश्यक आहे.

१) सदर स्वतंत्र स्वीय प्रपंजी खाते (PLA) याचे वेळोवेळी लेखापरीक्षण केले गेले पाहिजे.

२) खाते व्यवस्थित ठेवले आहे की नाही याची प्रशासकाने वेळोवेळी खात्री केली पाहिजे.

३) स्वीय प्रपंजी लेखा खात्यावर फक्त याचिकादारांकडून जमा करण्यात आलेली रक्कमच जमा करता येईल.

४) सदर स्वतंत्र स्वीय प्रपंजी खात्यातील शिल्लकीचे (PLA) न्यायालयाकडून त्रैमासिक अथवा मासिक तत्त्वावर मेळ बसविणे आवश्यक असेल.

५) महाराष्ट्र कोषागार अधिनियम, १९६८ मधील सर्व नियम स्वतंत्र स्वीय प्रपंजी खात्यास (PLA) लागू राहतील.

६) शासन निर्णय प्राप्त झाल्यानंतर स्वतंत्र स्वीय प्रपंजी खाते (PLA) उघडण्यासाठी मुख्य महालेखाकार कार्यालय, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई यांचेकडून प्राधिकारपत्र निर्गमित केले जाईल.

७) सदर ठेवी स्वीकारण्यासाठी न्यायालय किंवा सक्षम प्राधिकारी यांचे आदेश असणे आवश्यक आहे.

४. उपरोक्त अटींच्या अधीन राहून सदरहू शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २६७ / २०१५ / कोषा-५, दि. १७.११.२०१५ अन्वये तसेच मुख्य महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई यांचा अनौपचारिक सं.क्र. TM/Ch.२/UOR/HomeD/२०१६-१७/१७६३, दिनांक २४.०१.२०१७ अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०९१५०२४५१५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.02.09 15:06:37 +05'30'

(द. ह. कदम)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. प्रबंधक (निरीक्षणे) उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने)
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, पुणे,
३. जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, खेड-राजगुरुनगर, जिल्हा पुणे,
४. मुख्य महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा पुणे,
६. उपकोषागार अधिकारी, खेड-राजगुरुनगर, जिल्हा पुणे,
७. वित्त विभाग,(कोषा-५), मंत्रालय, मुंबई-३२
८. विधि व न्याय विभाग (कार्या-११), मंत्रालय, मुंबई-३२
९. निवड नस्ती (परि-५).